**पीक उत्पादन खर्च योजनेअंतर्गत गावपातळीवर कार्यरत असणाऱ्या क्षेत्र सहाय्यकांनी ग्रामपंचायत कार्यालयात हजेरी लावणेबाबत**

## महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र.शेमाभास-२००९/प्र.क्र.१२५
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक :- १३ नोव्हेंबर, २००९

**वाचा :-** शासन निर्णय, कृषि व सहकार विभाग क्र.अेपीसी-१०७५/३६०३६-११ अे, दि.५ मार्च, १९७९

**प्रस्तावना :-**

राज्यात पीक उत्पादन खर्च योजना राबविण्यात येत असून, सदर योजनेअंतर्गत उपरोक्त शासन निर्णयान्वये आवश्यक ती पदे निर्माण करण्यात आली आहेत. पीक उत्पादन खर्चाच्या आधारे राज्य शासन प्रत्येक वर्षी किमान आधारभूत किंमतींचे प्रस्ताव केंद्रिय कृषि मूल्य व किंमत आयोग, भारत सरकार, नवी दिल्ली यांचेकडे सादर करीत असते. या योजनेअंतर्गत गाव स्तरावर निवड करण्यात आलेल्या शेतकऱ्यांची दैनंदिन माहिती गोळा करण्याकरिता एका क्षेत्र सहाय्यकाची पूर्ण वेळ नियुक्ती केलेली असते. क्षेत्र सहाय्यकांच्या कामावर नियंत्रण ठेवण्यासाठी क्षेत्रिय स्तरावर क्षेत्र पर्यवेक्षक व विद्यापीठ स्तरावर क्षेत्र अधिकारी देखरेख करीत असतात. काही ठिकाणी या योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे होत नसल्याचे दिसून आले. सदर योजनेअंतर्गत शेतकऱ्यांचा सहभाग अत्यंत महत्वाचा असतो. गाव स्तरावर योजनेची संपूर्ण माहिती गावातील शेतकऱ्यांना असणे गरजेचे आहे. मात्र बऱ्याच गावसमूहातील शेतकऱ्यांना योजनेची पूर्ण माहिती नसल्याने त्यांचेकडून योजनेची माहिती प्राप्त करण्यात अडचणी येतात. दुसरे असे की, या योजनेअंतर्गत काम करणारे क्षेत्र सहाय्यक, क्षेत्र पर्यवेक्षक व क्षेत्र अधिकारी हे कृषि क्षेत्रातील तज्ञ असल्यामुळे त्यांच्या ज्ञानाचा फायदा शेतकऱ्यांना त्यांच्या पीक पध्दतीविषयीच्या अडचणी सोडविण्याकरिता होणे अत्यंत आवश्यक आहे. गांवसमूहातील पीक पध्दती, बियाणे, खते, किडींवरील उपचार इ. विविध बाबींवरील माहिती व विद्यापीठ स्तरावरील तज्ञांचे सल्ले क्षेत्र कर्मचाऱ्यांमार्फत गांवसमूहातील सर्व शेतकऱ्यांना उपलब्ध झाल्यास ते शेतकऱ्यांना हितकारक ठरेल. सदर योजनेचा हेतू साध्य होण्यासाठी / योजना यशस्वी होण्यासाठी संबंधित क्षेत्र सहाय्यकाने गांवसमूहामध्ये नियमितपणे काम करणे तसेच शेतकऱ्यांना आवश्यक ते मार्गदर्शन करणे आवश्यक आहे. या सर्व बाबींचा विचार करुन क्षेत्र सहाय्यकांनी ग्रामपंचायत कार्यालयात उपस्थिती नोंदविण्याचा व त्यांच्या उपस्थितीवर सरपंचांनी नियंत्रण ठेवण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

पीक उत्पादन खर्च योजनेअंतर्गत गावपातळीवर कार्यरत असणाऱ्या क्षेत्र सहाय्यकांनी ग्रामपंचायत

**कृ.मा.प.**

कार्यालयात हजेरी लावणेबाबत विद्यापीठांच्या क्षेत्र अधिकाऱ्यांशी चर्चा केल्यानंतर सदर योजना प्रभावीपणे राबविण्यासाठी शासन खालील प्रमाणे आदेश देत आहे.

**१)** गांवसमूहामध्ये नियुक्त केलेल्या क्षेत्र सहाय्यकाने कामाच्या प्रत्येक दिवशी किमान एक तास ग्रामपंचायत कार्यालयात बसणे, ग्रामपंचायत कार्यालयात ठेवण्यात आलेल्या हजेरी पुस्तकात सही करणे आवश्यक राहील तसेच शेतीविषयक विविध बाबींवर गावकऱ्यांशी / शेतकऱ्यांशी चर्चा करणे आवश्यक राहील. खरीप/रब्बी/ फळपिके/भाजीपाला व फुले या पिकपध्दतीसाठी नियुक्त केलेल्या सर्व क्षेत्र सहाय्यकांना नियमित हजेरी नोंदविणे अनिवार्य राहील.

**२)** ग्रामपंचायतींमार्फत सुट्टीच्या दिवशी शेतीविषयक चर्चासत्र / सभा इ.आयोजित करण्यात आल्यास या कार्यक्रमास क्षेत्र सहाय्यकांनी न चुकता उपस्थित रहावे व या उपस्थितीची नोंद हजेरी पुस्तकात नोंदवावी. हजेरी पुस्तक व अभिप्राय नोंदवही संबंधित पीक समन्वयक तथा विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग यांनी उपलब्ध करुन द्यावी.

**३)** या योजनेच्या क्षेत्र पर्यवेक्षकांनी प्रत्येक महिन्यातून किमान दोनदा ग्रामपंचायत कार्यालयास भेट द्यावी व ग्रामपंचायत कार्यालयातील अभिप्राय नोंदवहीमध्ये आपले अभिप्राय नोंदवावेत तसेच ते ज्या ज्या वेळी क्षेत्र सहाय्यकाच्या कामाची तपासणी करण्यासाठी गांवसमूहांना भेटी देतील त्या त्या वेळी त्यांनी ग्रामपंचायत कार्यालयास भेट देवून शेतकऱ्यांना शेतीविषयक सल्ला द्यावा व मार्गदर्शन करावे.

**४)** या योजनेच्या क्षेत्र अधिकाऱ्यांनी महिन्यातून किमान एकदा ग्रामपंचायत कार्यालयाला भेट देवून शेतकऱ्यांच्या समस्या / अडचणी जाणून घ्याव्यात आणि त्यांना मार्गदर्शन करावे. काही शंकांचे समाधान त्याचवेळी करणे शक्य झाले नाही तर अशा समस्यांबाबत विद्यापीठातील विषय तज्ञांशी चर्चा करुन पुढील भेटीच्या वेळेस शेतकऱ्यांना अशा समस्यांबाबत मार्गदर्शन करावे.

**५)** क्षेत्र सहाय्यकांच्या कामावर नियंत्रण रहावे यासाठी ग्रामपंचायत कार्यालयात ठेवण्यात येणाऱ्या हजेरी पुस्तकाच्या / अभिप्राय नोंदवहीच्या आधारे प्रत्येक महिन्याच्या हजेरीचा अहवाल सोबतच्या विहित प्रपत्रात तयार करुन ग्रामपंचायतीचे सरपंच अथवा त्यांच्या अनुपस्थितीत उप सरपंच यांचेकडून प्रमाणित करुन घेवून क्षेत्र सहाय्यकांनी पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत क्षेत्र पर्यवेक्षकांचेमार्फत क्षेत्र अधिकाऱ्यांना सादर करावा.

**६)** कृषि विद्यापीठांचे पीक समन्वयक तथा विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग यांनी ग्रामपंचायत स्तरावरील अहवालांच्या आधारे त्रैमासिक अहवाल तयार करुन, प्रत्येक तिमाहीचा अहवाल सरपंचांच्या अहवालाच्या प्रतिसह, तिमाहीनंतरच्या महिन्याच्या पहिल्या आठवड्यात शासनास सादर करावा.

**७)** एखादा क्षेत्र सहाय्यक ग्रामपंचायत कार्यालयात हजेरी लावत नाही, गांवसमूहात गैरहजर असतो किंवा शेतकऱ्यांना योग्य सहकार्य देत नाही असे सरपंचाच्या अहवालाच्या आधारे निदर्शनास आल्यास संबंधित क्षेत्र

सहाय्यकांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई पीक समन्वयक तथा विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग यांनी करावी व अशा प्रकारच्या केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

**८)** क्षेत्र सहाय्यकांना ग्रामपंचायत कार्यालयात बसून शेतकऱ्यांशी संवाद साधणे शक्य व्हावे याकरिता ग्रामपंचायतीने क्षेत्र सहाय्यकांना बसण्याची सोय विनामुल्य उपलब्ध करुन द्यावी.

सदर शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८/ पंरा-४, दि.३१/१०/२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२००९१११३१७४१५२००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर
कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी
विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर
विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी
क्षेत्र अधिकारी, पीक उत्पादन खर्च योजना, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर
क्षेत्र अधिकारी, पीक उत्पादन खर्च योजना, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
क्षेत्र अधिकारी, पीक उत्पादन खर्च योजना, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
क्षेत्र अधिकारी, पीक उत्पादन खर्च योजना, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि.रत्नागिरी
क्षेत्र सहाय्यक / क्षेत्र पर्यवेक्षक (सर्व ) ( क्षेत्र अधिकाऱ्यांमार्फत )
महसूल आयुक्त (सर्व) / जिल्हाधिकारी (सर्व) / मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व )
आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
विभागीय कृषि सह संचालक (सर्व ) / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व )
गट विकास अधिकारी (सर्व ) (जिल्हा परिषदेमार्फत )
संबं धित ग्रामपंचायत कार्यालय (क्षेत्र सहाय्यकांमार्फत )
ग्राम विकास व जलसंधारण विभाग / सहकार व पणन विभाग / अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
कृषि व पदुम विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, शेतमाल भाव समिती कक्ष, मुंबई

## पीक उत्पादन खर्च योजनेअंतर्गत क्षेत्र कर्मचाऱ्यांच्या उपस्थितीबाबतचे प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, पीक उत्पादन खर्च योजनेअंतर्गत गांवसमूह------------------ --------------- ता.--------------- जि.--------------- मध्ये नियुक्त करण्यात आलेले क्षेत्र सहाय्यक श्री-------------------------------------------- यांनी माहे -------------------- मध्ये ग्रामपंचायत कार्यालयात एकूण ------------------------------- दिवस उपस्थित राहून हजेरी नोंदविली आहे तसेच पर्यवेक्षक श्री ----------------------------------------- यांनी ----------------------------- या तारखांना, तर क्षेत्र अधिकारी श्री----------------------------------------------- यांनी -------------------------- या तारखेस ग्रामपंचायत कार्यालयास भेट दिली आहे.

संबंधितांनी ग्रामपंचायत कार्यालयात उपस्थित राहून शेतकऱ्यांना केलेल्या मार्गदर्शनाबाबतचे अभिप्राय खालीलप्रमाणे आहेत.

**दिनांक :-**

**सरपंच (सही)**
**नाव**

**(ग्रामपंचायत कार्यालयाचा शिक्का)**